सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांना सादिल अनुदान मंजूर व वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक:-सादिल-२०२१/प्र.क्र.२०६/एसएम-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २९ मार्च, २०२२

वाचा :- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. पीआई-१०९४/७०४(दोन)/प्राशि-१, दिनांक १४ नोव्हेंबर, १९९४.
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/ एसएम-४, दिनांक ०४ जून, २०२०.
(३) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/ एसएम-४, दिनांक २९ नोव्हेंबर, २०२१
(५) शिक्षण संचालक (प्राथमिक), म.रा., पुणे यांचे पत्र क्र. अंदाज/ अनु.मा./२०२२/ २०१/२५५, दिनांक २० जानेवारी, २०२२
(६) समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक ०४ मार्च, २०२२
(७) शिक्षण संचालक (प्राथमिक), म.रा., पुणे यांचे पत्र क्र.अंदाज/ अनु.मा./२०२२/ २०१/१२०६, दिनांक २४ मार्च, २०२२

**प्रस्तावना:-**

स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळासाठी भौतिक, शैक्षणिक सुविधा व दैनंदिन उपयोगाचे साहित्य उपलब्ध करण्यासाठी मागील वर्षाच्या वेतन खर्चाच्या ४ टक्केपर्यंत सादिलवार खर्च करण्यास संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सादिलवार खर्च करावयाच्या अनुज्ञेय बाबींच्या यादीमध्ये संदर्भ क्र.(२) व (४) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे.

उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदींना अनुसरुन, संदर्भ क्र.(६) येथील शासन निर्णय, दिनांक ०४ मार्च, २०२२ अन्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळांच्या किरकोळ खर्चासाठी अनुदान निर्धारण पूर्ण झालेल्या जिल्ह्यासाठी रु.२२५०.०० लक्ष व जिल्हा परिषदांनी प्राथमिक शाळांसाठी भाडेतत्वावर घेतलेल्या खाजगी इमारती जागेचे थकित भाडे अदा करण्याकरीता रु.१२००.०० लक्ष असा एकूण रु.३४५०.०० लक्ष इतका निधी संबंधितांना मंजूर व अदा करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या सुपूर्द करण्यास

शासन मान्यता देण्यात आली आहे. शिक्षण संचालक (प्राथमिक), म.रा., पुणे यांनी संदर्भ क्र.(७) येथील पत्रान्वये कळविल्यानुसार सादिल अनुदानातून तात्पुरत्या खंडीत (Temporary Disconnected) असलेल्या जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळांच्या वीज देयकाची तसेच, कायम स्वरुपी खंडीत ( Permanently Disconnected ) असलेल्या वीज देयकाची रक्कम अदा करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार स्थानिक स्वराज्य संस्थेच्या तात्पुरत्या स्वरुपात खंडीत केलेल्या व कायम स्वरुपी खंडीत केलेल्या वीज देयकांची रक्कम अदा करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन शुध्दीपत्रक :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा संदर्भाधीन क्र. (६) येथील शासन निर्णय, दिनांक ०४ मार्च, २०२२ मधील पहिला परिच्छेद वगळण्यात येत असून त्याऐवजी खालील परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहे.

संदर्भ क्र.(२) व (४) येथील शासन निर्णय, अनुक्रमे दिनांक ०४ जून, २०२० व दिनांक २९ जानेवारी, २०२१ मधील सुधारीत तरतूदीनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळांच्या किरकोळ खर्चासाठी अनुदान निर्धारण पूर्ण झालेल्या जिल्हा परिषदांसाठी रु.९,११,९९,०००/- ( रुपये नऊ कोटी अकरा लक्ष नव्यान्नव हजार फक्त ) व जिल्हा परिषदांनी प्राथमिक शाळांसाठी भाडेतत्वावर घेतलेल्या खाजगी इमारती जागेचे थकित भाडे अदा करण्याकरीता रु.११,१९,८४,७८९/- ( रुपये अकरा कोटी एकोणीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार सातशे एकोणनव्वद फक्त) तसेच, राज्यातील ६६८२ जिल्हा परिषद शाळांचे तात्पुरत्या स्वरुपात खंडीत (Temporary Disconnected) असलेल्या वीज देयकांची रक्कम अदा करण्यासाठी रु. ७,४०,००,०००/- ( रुपये सात कोटी चाळीस लाख फक्त ) व राज्यातील १४१४८ जिल्हा परिषद शाळांचे कायम स्वरुपी खंडीत ( Permanently Disconnected ) असलेल्या वीज देयकांची रक्कम अदा करण्यासाठी रु.६,७८,१६,२११/- ( रुपये सहा कोटी अठ्ठयाहत्तर लाख सोळा हजार अकरा फक्त ) असा एकूण रु.३४,५०,००,०००/- ( रुपये चौत्तीस कोटी पन्नास लाख फक्त ) इतका निधी संबंधितांना मंजूर व अदा करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या सुपूर्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी जिल्हा निहाय जिल्हा परिषद शाळांचे थकीत देयकांचा भरणा अन्य लेखाशिर्ष वा तरतूदीतून करण्यात आला नसल्याची खात्री करुन, सदर रक्कम महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अदा करण्याबाबतची कार्यवाही करावी. तसेच, महाराष्ट्र राज्य वीज

वितरण कंपनीने संबंधित जिल्हा परिषद शाळांची तात्पुरत्या स्वरुपात बंद (Temporary Disconnected) असलेल्या व कायम स्वरुपी बंद ( Permanently Disconnected ) असलेल्या वीज देयकांची थकीत रकमेची भरपाई करुन रितसर पोच शिक्षण संचालक (प्राथमिक) यांना देण्यात यावी व सदरहू रक्कम वीज कंपनीस अदा केल्याबाबतचे जिल्हा परिषद निहाय विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (शिक्षण), म.रा., पुणे यांना तसेच शासनास सादर करावे.

सदर रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, म.रा., पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन शुध्दिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२९१५०६०७००२१ असा आहे. हे शुध्दिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.03.29 16:59:51 +05'30'

**( टि. वा. करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) जिल्हाधिकारी, सर्व
७) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सर्व
९) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/अमरावती व नागपूर विभाग
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक ), जिल्हा परिषद, सर्व
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१५) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१६) निवड नस्ती, एसएम-४.